**राज्यातील सीसीटीएनएस प्रकल्पाच्या देखभाल, दुरुस्ती व प्रकल्पात सुधारणा करणेकरिता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-३६१६/प्र.क्र.८१/भाग-२/पोल-३,**

मंत्रालय, २ रा मजला, मुख्य इमारत,

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : १० फेब्रुवारी, २०२०

<u>वाचा</u> :- १) गृह विभाग, शासन निर्णय क्र. एमआयएस ०५०८/७४८/प्र.क्र.३२९/पोल-४, दि.२२.०५.२००९.

२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अध्यक्षतेखालील SEC ( State Empowered Committee) समितीच्या दि.०४.०७.२०१६ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

३) अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील दि.१२.०७.२०१६, दि.२८.१२.२०१६ व दि.१३.०६.२०१९ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

४) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय ॲपेक्स समितीच्या दि.१७.०१.२०१७, दि.१०.१०.२०१८ व दि.०७.०९.२०१९ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

५) सहायक पोलीस महानिरीक्षक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं १७/६१६२/सीसीटीएनएस प्रकल्प/१५-अ/२०१०, दि.१६.०१.२०१९.

६) अपर पोलीस महासंचालक,गुन्हे अन्वेषण विभाग , महाराष्ट्र राज्यपुणे , यांचे पत्र क्र. गुअवि/रागुअकें/सीसीटीएनएस/देयके-मे.विप्रो/१३४६/२०१९, दि.०३.१२.२०१९ व अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/१७/६१६२/सीसीटीएनएस प्रकल्प/१५-अ/२०१०, दि.१३.१२.२०१९.

७) गृह विभाग, शासन निर्णय क्र. सीसीटीएनएस-३६१५/प्र.क्र.२०२/भाग-१/पोल-३, दि.१८.०६.२०१९ व दि.३१.१०.२०१९ रोजीचे शासन शुध्दिपत्र.

<u>प्रस्तावना</u> :-

केंद्र शासनाच्या ई-गव्हर्नन्स योजनेअंतर्गत राज्यात सीसीटीएनएस प्रकल्प राबविण्यात येत आहे. सदर प्रकल्पांतर्गत राज्यातील १०५४ पोलीस ठाणी व ६२९ वरिष्ठ पोलीस कार्यालय CAS (Core Application Software) सॉफ्टवेअरव्दारे जोडण्यात आले असून सदर कार्यालयांमध्ये २ mbps नेटवर्क कनेक्टिव्हीटी उपलब्ध करुन देण्यात आली आहे. सदर प्रकल्पाचे दि.१५.०९.२०१५ रोजी सन्माननीय राज्यपाल महोदयांच्या हस्ते लोकार्पण पार पडले आहे. सदर प्रकल्प हा केंद्र पुरस्कृत आहे परंतु मार्च २०१८ नंतर या प्रकल्पासाठी केंद्र शासनाकडून निधी प्राप्त होणार नसल्याचे केंद्र शासनाने कळविले आहे. सबब सदर प्रकल्पाच्या देखभाल, दुरुस्ती व प्रकल्पात सुधारणा करणेकरिता

येणारा खर्च राज्य शासनामार्फत करणे आवश्यक आहे. सहायक पोलीस महानिरीक्षक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई यांनी दि.१६.०१.२०१९ च्या पत्रान्वये CCTNS प्रकल्पाच्या देखभाल, दुरुस्ती व प्रकल्पात सुधारणा करणेकरिता सन २०१९-२० या वर्षासाठी रु.५३.८८ कोटी एवढा निधी उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केली होती. राज्यातील सीसीटीएनएस प्रकल्पाच्या देखभाल, दुरुस्ती व प्रकल्पात सुधारणा करणेकरिता दि.१८.०६.२०१९ च्या शासन निर्णयान्वये रु.४६,२०,९०,८९२/- एवढ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दि.१५.०३.२०१९ ते दि.१४.०९.२०१९ या कालावधीतील सिस्टम इंटीग्रेटर मे. विप्रो यांनी सादर केलेल्या रु.६,६६,४८,६३७/- एवढ्या रकमेची देयके अदा करण्याबाबत विनंती केली आहे. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>शासन निर्णय</u>** :

सीसीटीएनएस प्रकल्पाच्या देखभाल, दुरुस्ती व प्रकल्पात सुधारणा करणेकरिता सन २०१९-२० करीता सीसीटीएनएस प्रकल्पाचे सिस्टम इंटीग्रेटर मे. विप्रो यांना अदा करावयाचे रु.६,६६,४८,६३७/- (अक्षरी रुपये सहा कोटी सहासष्ट लाख अठ्ठेचाळीस हजार सहाशे सदतीस फक्त) एवढा निधी वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सीसीटीएनएस प्रकल्पाच्या देखभाल, दुरुस्ती व प्रकल्पात सुधारणा करणेकरिता येणारा खर्च "मागणी क्र. बी-१, २०५५-पोलीस, (००) १०९ जिल्हा पोलीस, (००) १४ गुन्हा व गुन्हेगारी माग काढण्यासाठी नेटवर्क यंत्रणा (राज्य योजना), दत्तमत, (२०५५ ए ०९७), ५२-यंत्रसामग्री व साधनसामग्री" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१९-२०२० च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्याला "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषीत करण्यात येत आहे. उपरोक्त निधी सीसीटीएनएस प्रकल्पांतर्गत करण्यात आलेल्या कामासाठी केंद्र शासनाच्या निदेशानुसार खर्च करावा व खर्च करण्यात आलेल्या रकमेची उपयोगिता प्रमाणपत्रे वेळोवेळी शासनास सादर करावीत.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-दोन, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अनु क्रमांक २७-अ, नियम क्रमांक ७६ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२१०१६१९४६४८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708
cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032,
street=MAIN BUILDING, 2ND FLOOR,MANTRALAY,MUMBAI,
ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2020.02.10 16:25:29 +05'30'

**(कैलास गायकवाड)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, गृह यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई.
११. अपर पोलीस महासंचालक (नि. व सं.), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. अपर पोलीस महासंचालक, राज्य गुन्हे अभिलेख कक्ष, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, मुंबई.
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१७. वित्त विभाग, व्यय-७/ वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई.
१८. कक्ष अधिकारी (अर्थ-१), गृह विभाग. मंत्रालय, मुंबई.
१९. निवडनस्ती, पोल-३.